राज्यातील चंद्रपूर, सिंधूदुर्ग व बीड जिल्ह्यांचा राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत Intensive जिल्हे म्हणून समावेश करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः मजीअ २०१५/प्र.क्र.१६२/योजना ३
बांधकाम भवन, २५, मर्झबान रोड, मुंबई ४०० ००१.
तारीख: २९ ऑक्टोबर, २०१५

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः एनआरएलएम २०११/प्र.क्र.१९६/योजना ३, दिनांक १८/७/२०११
२) शासन निर्णय क्रमांकः एनआरएलएम २०११/प्र.क्र.१९६/ योजना ३, १९/१०/२०११
३) शासन पत्र क्रमांकः एनआरएलएम २०११/प्र.क्र.१९६/ योजना ३, १८/११/२०११

प्रस्तावना -

केंद्र शासनाने स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजनेचे रुपांतर राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानात करण्याचा निर्णय घेतला. त्यानुसार राज्य शासनाने संदर्भाधीन क्रमांक १ नुसार राज्यात राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान राबविण्याबाबतचा निर्णय घेतला. अभियानांतर्गत पहिल्या टप्प्यामध्ये रत्नागिरी, नंदूरबार, सोलापूर, जालना, यवतमाळ, गडचिरोली या ६ जिल्ह्यांमध्ये इंटेनसिव्ह पध्दतीने अभियान राबविण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला. त्यानंतर संदर्भाधीन क्र.२ नुसार ठाणे, वर्धा व उस्मानाबाद या जिल्हांमध्ये इंटेनसिव्ह पध्दतीने अभियान राबविण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला. संदर्भाधीन क्र. ३ नुसार राज्यातील गोंदिया या नक्षलग्रस्त जिल्हाचा समावेश करण्याचा निर्णय घेण्यात आला. सद्यस्थितीत राज्यातील १० जिल्हांमध्ये इंटेनसिव्ह पध्दतीने अभियान राबविण्यात येत आहे. सदर अभियान टप्प्या-टप्प्याने संपुर्ण राज्यभर इंटेनसिव्ह पध्दतीने राबविण्यात येणार आहे.

केंद्रशासनाच्या शक्तीप्रदत्त समितीने दुस-या टप्प्यामध्ये सन २०१५-१६ या अर्थिक वर्षात इंटेनसिव्ह पध्दतीने राबविण्यासाठी राज्यातील १४ नवीन तालुक्यांची निवड करण्यास मान्यता प्रदान केली आहे. त्यानुसार, इंटेनसिव्ह पध्दतीने राबविण्यासाठी १४ नवीन तालुक्यांची निवड करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

राज्यात राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान इंटेन्सिव्ह पध्दतीने राबविण्यासाठी जिल्हा निवड करण्याच्या बाबीवर अभियानाच्या राज्यस्तरीय नियंत्रण समितीच्या बैठकीत चर्चा झाली. त्यानुसार

नियोजन विभागामार्फत चंद्रपूर व सिंधूदुर्ग जिल्ह्यांची Micro Level Intensive Planning करिता निवड करण्यात आली आहे. त्यामुळे या दोन जिल्ह्यांमधील तालुक्यांमध्ये दोन्ही योजनांचा कृतीसंगम करणे शक्य होईल. तसेच बीड जिल्ह्यातील स्त्री भ्रूणहत्यांची अधिक संख्या आणि स्त्री साक्षरतेचे कमी प्रमाण आहे. या निकषांच्या आधारे चंद्रपूर, सिंधूदुर्ग व बीड जिल्ह्यांमधील तालुक्यांचा समावेश इंटेन्सिव्ह पध्दतीने करण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला.

२. राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान राज्यात दुस-या टप्प्यात इंटेन्सिव्ह पध्दतीने वर्धा, गोंदिया, गडचिरोली, यवतमाळ, उस्मानाबाद, जालना, नंदुरबार, रत्नागिरी, ठाणे व सोलापूर या दहा जिल्हयांबरोबरच चंद्रपूर, सिंधूदुर्ग व बीड जिल्हयांतही राबविण्यात येईल.

३. या जिल्ह्यांमधील तालुक्यांची निवडपध्दती यापूर्वी निवडलेल्या तालुक्यांप्रमाणे राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५१०२९११३३४६२७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Vishvambhar Gujar

Digitally signed by Vivek Vishvambhar Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vivek Vishvambhar Gujar
Date: 2015.10.29 17:14:40 +05'30'

(व्ही.व्ही.गुजर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री, ग्रामविकास यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री, ग्रामविकास यांचे खाजगी सचिव,महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. अप्पर मुख्य सचिव, नियोजन/वित्त, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव/सचिव, सामाजिक न्याय/आदिवासी विकास/महिला व बाल कल्याण/सहकार/कृषि व पदुम/उद्योग व उर्जा व कामगार/आरोग्य/शालेय शिक्षण/उच्च व तंत्र शिक्षण/कौशल्यवृध्दी व उद्योजगता, मंत्रालय, मुंबई.
८. महालेखापाल (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.

१०. सर्व विभागीय आयुक्त.

११. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,

१२. सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,

१३. निवडनस्ती.